**महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळाचे इंडसइंड बँकेमध्ये बचत खाते उघडण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन आदेश क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.११४/उद्योग-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०६/०५/२०२५

**वाचा:** १) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.८८/२३/कोषा-प्रशा-५, दिनांक ०३/१०/२०२३.
२) महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळाचे पत्र क्र.महावित्त/मु.का./लेखा विभाग/२०२४-२५/१५२, दिनांक २९/०८/२०२४.
३) महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळाचे पत्र क्र.महावित्त/मु.का./लेखा विभाग/२०२४-२५/३५९, दिनांक १५/०१/२०२५

**शासन आदेश:**

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, वित्त विभागाने खालील अटींच्या अधीन राहून दिलेल्या मान्यतेनुसार, इंडसइंड बँक, फोर्ट, मुंबई-४०० ००१ या बँकेत महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळाचे नवीन बचत खाते उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

i. सदर नवीन बचत खात्याचा वापर महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळास विविध दायित्वाची पूर्तता करण्यासाठी तसेच आस्थापना व कर्मचाऱ्यांच्या पगाराचा खर्च, विधी तज्ज्ञांना लागणारी फी, इ.खर्च भागविण्यासाठी करण्यात यावा.
ii. सदर बचत खात्यातील अखर्चित रकमा शासनाकडे समायोजित करणे आवश्यक राहील.
iii. सदर बचत खात्यातील व्यवहाराचे मासिक/तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण अनिवार्य राहील.
iv. सदर बचत खात्यात दिर्घकाळ निधी विनावापर पडून राहणार नाही या दृष्टीने दक्षता घेण्यात यावी.
v. सदर बचत खात्यातील व्यवहारांचा मासिक ताळमेळ कार्यालयीन रोख वही (Cash Book) अद्ययावत ठेवणे अनिवार्य राहील.
vi. सदर बचत खाते बंद करण्यात आल्यास त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली महामंडळाने तात्काळ जमा करावी.
vii. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मंडळाने महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र.(३), (८), (१३) व (१५) तसेच मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम ७ यांचे पालन करावे.
viii. वित्त विभागाच्या दिनांक ०३/१०/२०२३ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच यासंदर्भात वित्त विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन व्हावे.
ix. वित्तीय औचित्याच्या सूत्राचे काटेकोर पालन करण्यात यावे.

२. सदर शासन आदेश, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६/२०२५/व्यय-१६, दिनांक ३१/०१/२०२५ व अनौपचारीक संदर्भ क्र. ४९/२०२५/को.प्र.५, दिनांक २७/०२/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.    सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०६१७१६१००६१० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2025.05.06 17:17:19 +05'30'

**( राजीव राजमाने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, फोर्ट, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६/कोषा-प्रशा-५), मंत्रालय, मुंबई -३२.
६) निवडनस्ती/उद्योग-७